**वर्कप्लॅन अंतर्गत सन २०१० - २०११ मध्ये अखर्चित राहिलेल्या निधीस कृषि यांत्रिकीकरणाची १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०११ - १२ मध्ये खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो - १६११ / प्र.क्र. २७९ /४अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२,**
**दिनांक: - १८ नोव्हेंबर, २०११**

**संदर्भ** :- १ ) शासन निर्णय, क्रमांक :- कृयांयो -१६१० /प्र.क्र.१८६/४अे, दि. २८ जून, २०१०, २६ जुलै, २०१० व २५ जानेवारी, २०११

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १२-४ /२०११- एम.एम, दिनांक :- १२ जुलै, २०११

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र.नियोजन -४/कृआ-२०११-१२ प्रक्र.९३/ ३३३/२०११, दि. २६/९ /२०११

४) कृषि व पदुम विभाग, कार्यासन २-अे ची दि. १४/११/ २०११ ची टिप्पणी

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना कृषि यांत्रिकीकरण करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी सन १९८५-८६ पासून १००% केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राज्यात राबविण्यात येत आहे.

केंद्र शासनाने त्यांच्या दि. १२ जुलै, २०११ च्या संदर्भाधीन पत्रान्वये, कृति आराखड्यांतर्गत सन २०१० -११ मधील रू. २०७.४५ लाख अखर्चित निधी पुर्नजिवित करून, पिकसंवर्धन मधील योजनांसाठी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. सदर निधीपैकी रू. १६८.३९ लाख निधी, १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि अभियांत्रिकीकरण योजनेंतर्गत खर्च करण्यास मंजूरी दिलेली आहे. कृषि आयुक्तालयाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २६ सप्टेंबर, २०११ च्या पत्रान्वये सदर निधी वितरित करण्यासाठी शासन निर्णय निर्गमित करण्याबाबत शासनास विनंती केली आहे. केंद्र शासनाने सदर अखर्चित निधी खर्च करण्यास दिलेली मान्यता विचारात घेता, त्याचप्रमाणे कृषि आयुक्तालयाने सदर निधी वितरित करण्याच्या दृष्टिने केलेल्या विनंतीनुषंगाने सन २०१० - ११ मधील अखर्चित निधी रू. १६८.३९ लाख ( रू. एक कोटी अडुसष्ट लाख एकोणचाळीस हजार फक्त ) निधी, १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि अभियांत्रिकीकरण योजनेंतर्गत खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने त्यांच्या दि. १२ जुलै, २०११ च्या संदर्भाधीन पत्रान्वये, कृति आराखड्यांतर्गत सन २०१० -११ मधील रू. २०७.४५ लाख अखर्चित निधी पुर्नजिवित करून, पिकसंवर्धन मधील योजनांसाठी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. सदर निधीपैकी रू. १६८.३९ लाख निधी, १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि अभियांत्रिकीकरण योजनेंतर्गत खर्च करण्यास मंजूरी दिलेली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मंजूरीच्या अनुषंगाने रू. १६८.३९ लाख ( रू. एक कोटी अडुसष्ट लाख एकोणचाळीस हजार फक्त ) निधी, १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि अभियांत्रिकीकरण योजनेंतर्गत खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता या शासन निर्णयाद्वारे देण्यात येत आहे.

२. या योजनेसाठी मंजूर केलेला रू. १६८.३९ लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०११ - १२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष :-**
**मागणी क्रमांक डी -३,**
**२४०१-पीक संवर्धन**
**११३- कृषि अभियांत्रिकी**
**(००) (०८ ) कृषि यांत्रिकीकरणास प्रोत्साहन**
**(२४०१ २५१३ ) ( १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना )**
**३३ - अर्थसहाय्य**

३.	सदर वितरित करण्यात आलेला निधी सन २०१०-११ मध्ये दि. २८ जून, २०१०, २६ जुलै, २०१० व २५ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात यावा.

**४.**	या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत असून या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहिल याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे वितरित करण्याची जबाबदारी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांची राहिल .

**५.**	सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २४५ / ११ / व्यय - १ दि.५ नोव्हेंबर, २०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाची www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१११११२२१०२८३८००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( श्री. वि. जाधव )**
**महाराष्ट्र शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.( ५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे.(१० प्रती)
जिल्हाधिकारी (सर्व)
अध्यक्ष, सर्व जिल्हा परिषदा
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
सर्व संचालक/ सहसंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या.राजन हाऊस,प्रभादेवी, मुंबई-२५
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हापरिषद)
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
सर्व कोषागार अधिकारी
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन महासंघ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,भूविकास बँक, मुंबई
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग/ वित्त विभाग/ग्राम विकास विभागमंत्रालय, मुंबई-३२
सर्व सह सचिव/ उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी (कृषि), कृषि व पदुम विभाग
निवडनस्ती